उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील अकृषि विद्यापीठे व धोरणात्मक बाबींशी संबंधित न्यायालयीन प्रकरणे हाताळण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः- संकीण- २०२०/प्र.क्र.११७/२०/विशि-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:-१७ मार्च, २०२०.

**परिपत्रक :-**

मा. उच्च व सर्वोच्च न्यायालयामध्ये महत्वाच्या धोरणात्मक तसेच अन्य बाबींच्या अनुषंगाने उद्भवलेल्या न्यायालयीन प्रकरणे हाताळताना बऱ्याचदा क्षेत्रिय कार्यालयाकडून निष्काळजीपणा व दिरंगाई होत असल्याचे निदर्शनास येत आहे. विशेषत: सरकारी वकील किंवा विशेष समुपदेशक यांना न्यायालयीन प्रकरणात होणाऱ्या सुनावणीपूर्वी प्रकरणाची परिपूर्ण व इत्यंभूत माहिती न देणे, विहित वेळेत शपथपत्र दाखल न करणे, इ. बाबी वारंवार होत असल्याचे निदर्शनास येत आहे. परिणामी अशा न्यायालयीन प्रकरणांमध्ये शासनाची बाजू योग्य व प्रभावीपणे मांडली न गेल्याने बऱ्याच प्रकरणांमध्ये शासनाच्या विरुध्द न्यायनिर्णय होत आहेत. तसेच शासनाकडून जेव्हा एखाद्या प्रकरणात मा. सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुमती याचिका (SLP) केली जाते, असे प्रकरण शासनाच्या धोरणाशी संबंधित असते व व्यापक स्वरूपात परिणाम करणारे असते. तसेच बऱ्याचदा राज्य शासनावर आर्थिक भार देखील येतो. अशा प्रकारची सर्वोच्च न्यायालयात दाखल प्रकरणे हातळताना देखील दिरंगाई/निष्काळजीपणा होत असल्याचे निदर्शनास येत आहे. ही बाब अत्यंत गंभीर स्वरूपाची आहे. न्यायालयीन प्रकरणे विहित वेळेत व काळजीपूर्वक हाताळणे आवश्यक आहे. त्यामुळे संचालक, उच्च शिक्षण व संबंधित विभागीय सहसंचालक यांनी खालील अटींचे काटेकोर पालन करावे.

१. मा. न्यायालयात प्रकरण दाखल झाल्याचे समजताच त्याबाबतची याचिका ताबडतोब संबंधित सरकारी वकील यांच्याकडून प्राप्त करून घ्यावी.
२. याचिकेमध्ये याचिकाकर्ते यांची मागणी व शासनाचे प्रचलित धोरण विचारात घेऊन सरकारी वकील यांच्या सहाय्याने शथपत्राचा मसुदा तयार करून शपथपत्र मा. न्यायालयात तातडीने दाखल करावे, आवश्यकता भासल्यास शपथपत्राचा मसुदा शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा व त्याचा पाठपुरावा करून व शासनाची मान्यता घेऊन त्याप्रमाणे शपथपत्र मा. न्यायालयात दाखल करावे.
३. संबंधित अधिकारी यांनी प्रत्येक न्यायालयीन प्रकरणाच्या प्रत्येक सुनावणीस न्यायालयात उपस्थित राहावे, ज्या दिनांकास न्यायालयात उपस्थित होते, त्या दिनांकास कोणत्या वकीलांना भेटले, कोणत्या दिवशी सरकारी वकीलांशी सल्लामसलत केली किंवा निर्देश दिले याबाबत शासनास अवगत करावे.
४. मा. न्यायालयात शासनाच्या वतीने कोणत्या सरकारी वकीलांनी युक्तीवाद केला, युक्तीवाद हा याचिकाकर्ते यांच्या मागणीच्या अनुषंगाने झाला किंवा नाही, सुनावणी दरम्यान मा. न्यायालयाने कोणते आदेश/निर्देश किंवा निर्णय दिला, सदरचा निर्णय हा शासनाच्या ध्येयधोरणाविरुध्द आहे किंवा कसे याबाबतचा सविस्तर अहवाल संचालक, उच्च शिक्षण यांच्या मार्फत त्याच दिवशी किंवा कोणत्याही परिस्थितीमध्ये दुसऱ्या दिवशी शासन सादर करावा.
५. कनिष्ठ न्यायालयाने एखाद्या प्रकरणात दिलेल्या आदेशाविरुध्द वरिष्ठ न्यायालयात अपील करावयाचे असल्यास अपील व युक्तीवाद करण्याबाबतचे मुद्दे व संबंधित सरकारी वकील यांचे अभिप्राय घेऊन तसा प्रस्ताव तात्काळ सादर करावा.
६. मा. उच्च न्यायालयाच्या निर्णयाविरुध्द मा. सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुमती याचिका (SLP) दाखल/अपील दाखल केले जाते, अशा प्रकरणांमध्ये राज्य शासनाच्या धोरणाशी संबंधित युक्तीवाद

करण्यायोग्य मुद्दे संबंधित सरकारी वकील किंवा विशेष समुपदेशी यांच्या निदर्शनास आणून देण्यात याव्यात.

७. संचालक व विभागीय सहसंचालक स्तरावर त्यांच्याशी संबंधित तसेच शासन धोरणांशी निगडीत न्यायालयीन प्रकरणाचा विशेषत: सर्वोच्च न्यायालयातील प्रकरणांचा आढावा घेऊन त्याचा तक्ता तयार करून सदर प्रकरणांवर करावयाच्या कार्यवाहीचे नियोजन करावे.

८. प्रत्येक न्यायालयीन प्रकरणांत वेळोवेळी झालेले आदेश, त्यामध्ये शासनाची बाजू मांडणारे वकील, शासनाची भूमिका, शपथपत्र दाखल केल्याच्या तारखा या सर्व बाबींचा विचार करून अशा प्रत्येक प्रकरणांत संबंधित सरकारी वकील किंवा नियुक्त विशेष समुपदेशी यांना प्रकरणाची सर्व माहिती/ कागदपत्रे उपलब्ध करून द्यावीत.

९. तसेच एखाद्या महत्वाच्या व शासन धोरणाशी संबंधित असलेल्या न्यायालयीन प्रकरणाच्या सुनावणीपूर्वी संबंधित सरकारी वकील किंवा नियुक्त विशेष समुपदेशी यांच्याशी दूरध्वनी / भ्रमणध्वणीवरून संचालक, उच्च शिक्षण, विभागाचे सचिव / प्रधान सचिव / अपर मुख्यसचिव व संबंधित अधिकारी यांची Tele Conference व्दारे चर्चा घडवून आणावी व सर्व मुद्दे अवगत करण्यात यावेत.

१०. उपरोक्त सूचनांचे काटेकोर पालन करावे. सदरहू सूचनांचे पालन न केल्यास अथवा न्यायालयीन प्रकरण हाताळण्यास दिरंगाई किंवा निष्काळजीपणा झाल्याचे आढळून आल्यास संबंधितांविरुध्द शिस्तभंग विषयक कार्यवाही सुरू करण्यात येईल.

२. सदरहू परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संकेतांक क्र. २०२००३१८१२४२४०९००८ असा आहे. सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay Eknath Sable

Digitally signed by Vijay Eknath Sable
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ad74dd20b49c8ab0bc83f54f3d9c91571a6cd47aeb9a9f05783d44cafe7a7d8e, serialNumber=ad8df0c87ab8e6c9f8574ab838dd4c466ebe81828f43e76bfa02129f8e862cd2, cn=Vijay Eknath Sable
Date: 2020.03.18 12:45:46 +05'30'

**( विजय साबळे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई,
२. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
३. मा. मुख्य मंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण,
६. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव,
७. मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव,
८. सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. स्वीय सहायक, सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. निवड नस्ती (विशि-१).